**जिल्हाधिकारी, नागपूर व त्यांच्या अधिनस्त क्षेत्रिय अधिकाऱ्यांसाठी जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन २४ बहुपयोगी वाहने (Multi-Utility Vehicle) खरेदीस मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५.

**संदर्भ :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.जेपीएस-२०१३/प्र.क्र.३१४/ई-८, दि.२१/०४/२०१६.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८,दि.२७/०६/२०२२.
३) नियोजन विभाग, शासन ज्ञापन,क्र.डिपीए-१०२२/प्र.क्र.१३९/का.१४८१, दि.१६/०१/२०२३.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.१३५/ई-८, दि.१०/०२/२०२५.
५) जिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्र.जिनिक/म.स./नै.आ.व्य/कावि.८१/२०२३, दि.२०/०४/२०२३ व क्र.जिनिक/म.स./नै.आ.व्य/ कावि.१४/२०२४, दि.१९/०१/२०२४.

**प्रस्तावना :-**

नागपूर जिल्हयात लेखाशिर्ष "२०५३- जिल्हा प्रशासन" या खाली वेतन आहरित करणाऱ्या जिल्हाधिकारी, नागपूर व त्यांच्या अधिनस्त २५ महसूली अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.२१/०४/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, नागपूर यांच्या दिनांक २०/०४/२०२३ व दिनांक १९/०१/२०२४ रोजीच्या पत्रान्वये नागपूर जिल्हयाकरीता "बहुपयोगी वाहन (Multi-Utility Vehicle)" हे जिल्हयात कायदा व सुव्यवस्था राखणे, आपात्कालीन परिस्थितीत पूर, दंगल यासारख्या परिस्थितीत तात्काळ घटनास्थळी पोहोचणे तिथे आवश्यक मदत करणे, बहुपयोगी वाहनाचा जिल्हा व तालुक्यातील विविध प्रकारच्या आपत्तीमुळे संवेदनशील व धोका असलेल्या ठिकाणांचा दौरा करण्याकरीता उपयोगात आणणे,जिल्हयात शहरी व ग्रामिण भागात आयोजित कार्यक्रम, महोत्सव, यात्रा, रॅली, इत्यादी ठिकाणी दौरा करणे, त्याठिकाणी कायदा व सुव्यवस्था, बैठक, प्रशिक्षण, मॉकड्रिल इत्यादीसाठी नागपूर

जिल्हयासाठी २४ बहुपयोगी वाहने (Multi-Utility Vehicle) खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

नागपूर जिल्हयात लेखाशिर्ष “२०५३- जिल्हा प्रशासन” या खाली वेतन आहरित करणाऱ्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांना “गतीमान प्रशासन तथा आपात्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण” या योजनेंतर्गत बहुपयोगी वाहन (Multi-Utility Vehicle) हे सध्या वापरात असलेल्या वाहनाचे विहित कार्यपध्दतीनुसार निर्लेखन केल्यानंतर, निर्लेखित वाहन संख्येच्या प्रमाणात **एक वेळची विशेष बाब** म्हणून नागपूर जिल्हयासाठी २४ नवीन बहुपयोगी वाहने (Multi-Utility Vehicle) खरेदीस खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे -

१. निधी उपलब्धतेनुसार बहुपयोगी वाहन (Multi-Utility Vehicle) खरेदीस रुपये १२.०० लक्ष ते रुपये ३५.०० लक्ष वाहन किंमत मर्यादेत वस्तु व सेवा कराचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे. सदर किंमतीमध्ये वाहनांच्या किंमतीसोबत टेम्परररी रजिस्ट्रेशन चार्जेस व सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादी साठीच्या खर्चाचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे.

२. निधी उपलब्धतेच्या व विहित कार्यपध्दतीच्या अवलंब करुन वाहन खरेदी करण्यात यावी. निर्लेखित वाहनाऐवजी नवीन बहुपयोगी (Multi-Utility Vehicle) वाहन खरेदीसाठी निधी उपलब्ध असणे आवश्यक राहील.

३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ दि.१७/०४/२०१५ मधील अ.क्र.१९-क, नियम ६९ अन्वये वाहन निर्लेखन आदेश निर्गमित होणे आवश्यक आहे.

४. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.भांखस-२०१४/ प्र.क्र. ८२/ भाग-III/उद्योग-४,दि.०१/१२/२०१६ व क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २१५/ उद्योग-४, दिनांक ०४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

५. जिल्हा वार्षिक योजनेतून जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नविन बहुपयोगी वाहन (Multi-Utility Vehicle) खरेदीचा खर्च भागविण्यास पुनःश्च याच कारणाकरीता इतर माध्यमातून निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही, याची दक्षता घेणे आवश्यक राहील. जिल्हा वार्षिक योजनेतून खरेदी करण्यात आलेल्या बहुपयोगी वाहनावरील खर्चाच्या अहवालाची स्वतंत्र नोंद ठेवावी. सदर नोंदीची प्रत शासनास पाठविण्यात यावी,

२. सदर बहुपयोगी (Multi-Utility Vehicle) वाहनासाठी येणारा खर्च महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८,दि.२७/०६/२०२२ अन्वये त्या-त्या आर्थिक वर्षाकरीता जिल्हा वार्षिक योजनेतर्गंत “गतिमान प्रशासन तथा आपात्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण” या योजनेच्या माध्यमातून नियोजन विभागाने नागपूर जिल्हयास उपलब्ध करुन दिलेल्या “मागणी क्र. ओ-६४, लेखाशीर्ष (२०५३ ए ४२२)” मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.०३/१४८१, दिनांक १४/०२/२०२५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२८१८४८०९६७१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.03.28 18:49:04 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अ.मु.स. (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२.
२. विभागीय आयुक्त, नागपूर.
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-२,महाराष्ट्र,नागपूर.
४. जिल्हाधिकारी, नागपूर
५. अतिरिक्त जिल्हाधिकारी, नागपूर.
६. उपजिल्हाधिकारी, नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८. उपविभागीय अधिकारी, नागपूर (शहर), नागपूर (ग्रामीण), मौदा, रामटेक, सावनेर, काटोल व उमरेड
९. तहसिलदार, नझुल/नागपूर (शहर)/नागपूर (ग्रामिण)/कामठी/हिंगणा/ रामटेक/ नरखेड/पारशिवणी/मौदा/सावनेर/उमरेड/कळमेश्वर/काटोल/भिवापूर व कुही.
१०. वित्त विभाग ( कार्यासन व्यय-९/विनियम ), मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग ( कार्यासन १४८१), मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवड नस्ती,( कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.